महात्मा ज्योतीबा फुले यांच्या जीवनकार्यावर आधारीत चित्रपट निर्मितीच्या प्रक्रियेवर देखरेख ठेवण्यासाठीच्या समितीवर नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्यांची नियुक्ती रद्द करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्रमांक - संकिर्ण २०२२/प्र.क्र. १७०/कार्या-३४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २५ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक - मावज २०१३/१४३/३४, दिनांक- ९ मार्च २०१८.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक-२०१३/प्र.क्र.१४३/३४, दिनांक २७ एप्रिल २०१८.
३. शासन निर्णय मावज-२०२१/ प्र.क्र.११७/कार्या.३४, दिनांक १२ मे,२०२१.

**प्रस्तावना:-**

महात्मा ज्योतिबा फुले यांच्या जीवनकार्यावर आधारित चित्रपट निर्मिती करण्याबाबत संदर्भाधीन क्रमांक १ वरील दिनांक ९ मार्च २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या चित्रपटाची संहिता / पटकथा प्रमाणित करणे निर्मिती ऐतिहासिक सत्यापन होत असल्याची खात्री करणे, निर्मिती प्रक्रियेवर देखरेख ठेवणे तसेच चित्रपट निर्मितीच्या प्रक्रियेवर देखरेख ठेवण्यासाठी संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १२ मे,२०२१ च्या शासन निर्णयान्वये तज्ञांची समिती गठीत करण्यात आली होती. मा. मुख्य सचिव यांच्या दिनांक १५ जुलै,२०२२ रोजीच्या टिप्पणीन्वये प्रशासकीय विभागाच्या अंतर्गत असणारे सर्व उपक्रम/ महामंडळे/ मंडळे/समित्या/प्राधिकरणे यावर नियुक्त करण्यात आलेल्या सर्व अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करण्याबाबत निर्देश देण्यात आले होते. त्याअनुषंगाने सदर समिती मधील सदस्यांची नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मावज-२०२१/प्र.क्र.११७/कार्या-३४, दिनांक १२ मे, २०२१ अन्वये महात्मा ज्योतिबा फुले यांच्या जीवन कार्यावर आधारित चित्रपट निर्मितीच्या प्रक्रियेवर देखरेख ठेवण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या तज्ञांच्या समितीमध्ये अशासकीय सदस्य म्हणून (१) श्री. पंढरीनाथ सावंत, (२) डॉ. अनुराधा ढेरे, (३) श्री. सदानंद मोरे, (४) श्री. हरी नरके व (५) श्री. दत्ता भगत या पाच अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यात आली होती. सदर

पाच अशासकीय सदस्यांपैकी डॉ. अरुणा ढेरे यांनी सदस्यपदाचा राजीनामा दिलेला आहे. तसेच, श्री. हरि नरके यांचे दिनांक ०९.०८.२०२३ रोजी निधन झाले आहे. तरी, उक्त प्रस्तावनेमध्ये नमुद मा. मुख्य सचिव महोदयांच्या दि.१५.०७.२०२२ च्या टिप्पणी मधील निर्देशानुसार उर्वरित (१) श्री. पंढरीनाथ सावंत, (२) श्री. सदानंद मोरे व (३) श्री. दत्ता भगत अशा तीन अशासकीय सदस्यांच्या नियुक्या या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०८२५१४४००६५५०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RIMA SUBHASH DUTTAROY

Digitally signed by RIMA SUBHASH DUTTAROY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=487393c812e41c98e63a7a73c63e1d078da4c3c899b4307a07d4d99b40a7d635, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B813A4CECE1744D0527A20F20D15FC2FFC7D4457A8AE2120E0D35781B42C049C, cn=RIMA SUBHASH DUTTAROY
Date: 2023.08.25 14:41:56 +05'30'

**( रिमा दत्तरॉय )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा व विधान परिषद
३. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधी व न्याय विभाग) यांचे खाजगी सचिव
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
६. प्रधान सचिव (मा.व ज.) यांचे स्वीय सहायक
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
८. समितीचे सर्व अशासकीय सदस्य
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१०.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२.संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई
१३. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१४.निवड नस्ती, कार्यासन-३४.